राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ , नवी दिल्ली.
सन २०१९-२० करिता भागभांडवल अंशदान वितरीत करणेबाबत. .

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांक मौआम-२०२०/प्र.क्र.११/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा -**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र : अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र : अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक २२ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास देशातील अल्पसंख्यांकांच्या विकासाकरिता राबवावयाच्या कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र शासनाचा हिस्सा म्हणून राज्यातील अल्पसंख्यांक लोकसंख्येच्या आधारावर निश्चित करण्यात आलेले रु.७१.५७ कोटी एवढे भाग भांडवली अंशदान राज्य शासनाने दयावयाचे आहे. त्यास अनुसरुन राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास एवंम वित्त निगम, नवी दिल्ली या महामंडळास सन २००२-०३ ते सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये भाग भांडवलातील अंशदान म्हणून एकूण रु.२५.४२ कोटी इतके भागभांडवल वितरीत करण्यात आले आहे. आता संदर्भ क्र.२ येथील वित्त विभागाच्या दि.२२ जानेवारी, २०२० रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता योजनांतर्गत कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबीवर निधी वितरणाची मर्यादा सुधारित अंदाज निश्चित होईपर्यंत दि. ८ जुलै, २०१९ च्या परिपत्रकानुसार राहील, अशा सूचना निर्गमित केल्या आहेत. संदर्भ क्र.१ येथील दि. ८ जुलै, २०१९ च्या शासन परिपत्रकान्वये कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्के मर्यादेत वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली यांना सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता भागभांडवल उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता योजनांतर्गत अर्थसंकल्पित तरतूद रु.५०.०० लाख इतकी आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील परिपत्रकान्वये कार्यक्रम खर्चाच्या निधी वितरणाची मर्यादा ६० % इतकी निश्चित केली असल्याने रु.३०.०० लाख (रुपये तीस लाख फक्त) इतका निधी भाग-भांडवली अंशदान म्हणून

राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास वितरीत करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे. हे भाग-भांडवल वितरीत केल्यानंतर राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळाकडे महाराष्ट्र शासनाचे एकूण वितरीत भागभांडवल रुपये २५.७२ कोटी इतके होईल.

२. उपरोक्त भागभांडवल राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली यांना प्रदान करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" आणि उपसचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर महामंडळास उक्त रक्कम एक रकमी पध्दतीने त्वरीत अदा करण्यात यावी.

३. सदर रक्कमेचा ई.सी.एस. (E.C.S.) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे नावे काढण्यात यावा.

४. वरील भागभांडवली अंशदानाच्या अनुषंगाने होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेडई-२,
४२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च,
०२, समाजकल्याण,
१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूक (योजनांतर्गत),
राज्य योजनांतर्गत योजना,
(०१) महामंडळांना सहाय्य
(०१)(०३) राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळाला भागभांडवली अंशदान (कार्यक्रम),
(४२३५ ०२४२)
३२, अंशदाने

५. " सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९ मधील परिच्छेद ७ येथील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची तसेच दि.२२ जानेवारी, २०२० च्या परिपत्रकांतील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२४१४३९३४१५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.02.24 14:46:00 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ), मुंबई/नागपूर
३) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास एवंम वित्त महामंडळ, नवी दिल्ली
४)उपसचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अवर सचिव (रोख शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी कृपया सदर रक्कमेचा धनादेश “Managing Director, National Minorities Development & Finance Corporation, New Delhi” या नावाने संबंधिताना देण्यात यावा.
६) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई
१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४ व साउ) मंत्रालय, मुंबई
११) नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१२) रोख शाखा व का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती, का.८